**आरंभ प्रतिष्ठान, डोंबिवली या संस्थेस आयोजित "तालसंग्राम" ही राज्यस्तरीय ढोल ताशा स्पर्धेकरिता विशेष बाब म्हणून निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२०/प्र. क्र.१/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०४ जानेवारी, २०२०

**प्रस्तावना-**

"आरंभ प्रतिष्ठान" डोंबिवली ही संस्था दरवर्षी "तालसंग्राम" ही राज्यस्तरीय ढोल ताशा स्पर्धा आयोजित करीत असते. सन २०१९-२० या वर्षातही दिनांक २६ व २७ जानेवारी, २०२० या कालावधीत सदर स्पर्धा आयोजित होणार असून या स्पर्धेच्या आयोजनासाठी येणा-या खर्चास "विशेष बाब" म्हणून मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

या शासन निर्णयान्वये, आरंभ प्रतिष्ठान, डोंबिवली या संस्थेद्वारे दिनांक २६ व २७ जानेवारी, २०२० या कालावधीत आयोजित करण्यात येणा-या "तालसंग्राम" या राज्यस्तरीय ढोल ताशा स्पर्धेसाठी एक विशेष बाब म्हणून रुपये २,५०,०००/- (रुपये दोन लाख पन्नास हजार फक्त) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (००) १०२, कला व संस्कृती यांचे प्रचालन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) राज्य नृत्य, नाटय, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य नृत्य, नाटय, तमाशा व संगीत महोत्सव (२२०५ १५०७) ५० इतर खर्च या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर खर्चास वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र.४, परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्राप्त अधिकारांनुसार मंजूरी देण्यात येत आहे.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१९/प्र.क्र. ९२/अर्थ-३, दिनांक ८ जुलै, २०१९ मधील तरतूदी व अटीनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांची राहील.

६.     सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००१०६१५३२४४७९२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vilas Ramrao Thorat

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, serialNumber=cb03c92b399cc89310bf1378c184d97a4b7b9b98e926ea8e71dd7bc9cb273631, cn=Vilas Ramrao Thorat
Date: 2020.01.06 18:03:26 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती, सां.का.४.